उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य खनिकर्म महमंडळ, मर्या. नागपूर यांच्या आस्थापनेवरील अधिकारी/ कर्मचाऱ्यांना सातवा वेतन आयोगानूसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## उद्योग, उर्जा व कामगार विभाग
**शासन निर्णय क्र. एमएसएमसी-०७१९/प्र.क्र.०९/उद्योग-९**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १४ सप्टेंबर, २०२१

संदर्भ : १.वित्त विभाग, शासन निर्णय क्र.शासाउ-२०१९/प्र.क्र.१३/सा.उ. दि.०४.०८.२०२१
२. शासन निर्णय क्र.एमएसएमसी-१०१०/प्र.क्र.६०४/उद्योग-९, दि.०५.१२.२०१४

**प्रस्तावना :-**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ, नागपूर यांच्या आस्थापनेवरील अधिकारी/ कर्मचारी यांना सहाव्या वेतन आयोगानूसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याबाबत संदर्भाधीन क्र.२ येथील दि.०५.१२.२०१४ रोजीच्या शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात आली होती. प्रस्तुत आस्थापनेवरील अधिकारी/ कर्मचाऱ्यांना संदर्भाधीन क्र.१ येथील वित्त विभाग, शासन निर्णय क्र.शासाउ-२०१९/प्र.क्र.१३/सा.उ., दि.०४.०८.२०२१ मधील तरतुदी व निकषांप्रमाणे सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनूसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ मर्या., नागपूर यांच्या आस्थापनेवर मंजूर आकृतीबंधानूसार एकुण १२७ अधिकारी/कर्मचाऱ्यांपैकी सध्या: २५ अधिकारी/ कर्मचारी कार्यरत आहेत. सदर अधिकारी/ कर्मचारी यांना खालील अटी व शर्तीच्या अधिन राहुन सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनूसार सोबतच्या विवरणपत्रात नमुद केलेप्रमाणे सुधारीत वेतनश्रेणी दि.०१.०७.२०२१ पासून लागू करण्यास शासन या आदेशान्वये मान्यता देत आहे.

१. महामंडळावरील संबंधीत अधिकारी/ कर्मचारी यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम-१९८१ मधील नियम ११ (२) मध्ये नमुद केलेल्या तरतुदीनूसार करण्यात यावी.
२. महामंडळाने वित्त विभाग/शासनाकडून सातव्या वेतन आयोगासंदर्भात निर्गिमित करण्यात आलेले व निर्गमित करण्यात येणाऱ्या शासन निर्णय/ परिपत्रकातील अटी व शर्तीनुसार सुधारित वेतनश्रेणीची अमंलबजावणी करावी.

३. सुधारीत वेतनश्रेणीचा लाभ देतांना शासनामधील समकक्ष पदांना लागू करण्यात आलेल्या वेतनश्रेणीपेक्षा महामंडळातील अधिकारी / कर्मचारी यांना मिळणारा लाभ जास्त असू नये, सुधारीत वेतनश्रेण्या त्या मर्यादेत लागू कराव्यात.

४. सद्यस्थितीत मंजूर असलेल्या पदांवरील अधिकारी/ कर्मचारी यांनाच सदर लाभ अनूज्ञेय असेल. नवीन पदे निर्माण केल्यास सदर लाभ अनुज्ञेय करतेवेळी शासनाची पूर्वमंजूरी घेणे आवश्यक राहील.

५. महामंडळातील रिक्त असलेली / झालेली पदे भरणे / नवीन पदे निर्माण करणे याबाबतची कार्यवाही शासनाच्या मान्यतेने करणे बंधनकारक असेल.

६. महामंडळाने यापूढे देखील प्रत्येक वर्षाचे वार्षिक लेखे विहित वेळेत पूर्ण करुन ते उचित कालमर्यादेत विधानमंडळासमोर सादर करावेत.

७. सन २०१९-२० करिता महामंडळाने ५% दराने शासनास लाभांश अदा केलेला आहे. सबब, यापूढे देखील महामंडळ नफ्यात राहील याद्दष्टीने महामंडळाने सातत्यपूर्वक प्रयत्न करणे आवश्यक असेल. महामंडळाने प्रत्येक आर्थिक वर्षी शासन निर्णय दि.२२.०२.२०१२ व त्यानंतर शासनाकडून जाहीर करण्यात येणाऱ्या लाभांशाच्या दरानुसार योग्य लाभांश शासनास नियमितपणे अदा करावा. सदर लाभांशाचे प्रमाण वाढविण्याचा महामंडळाने सकारात्मक निर्णय घ्यावा.

८. दि.०१.०७.२०२१ ते सुधारीत वेतनश्रेणीची अमंलबजावणी करेपर्यंतच्या कालावधीतील थकबाकी एकरकमी अथवा टप्याटप्याने अदा करणे याबाबतचा निर्णय घेण्याचा अधिकार पूर्णपणे महामंडळास राहील. तथापि, यामूळे व सुधारीत वेतनश्रेणी लागू केल्यामूळे महामंडळ भविष्यात तोटयात जाणार नाही, याची जबाबदारी महामंडळाची राहील. तसेच येणाऱ्या आर्थिक भाराची जबाबदारी पूर्णपणे महामंडळाची राहील, याबाबत शासनाकडून कोणतेही अनुदान उपलब्ध होणार नाही.

९. महामंडळाने त्यांजकडून राबविण्यात येणाऱ्या योजना/कामांचा उचित कालबध्द कार्यक्रम तयार करावा व त्याबाबतचा आढावा प्रशासकीय विभाग व वित्त विभागास वेळोवेळी सादर करावा.

१०. सुधारीत वेतनसंरचणेस नियमाप्रमाणे अनुज्ञेय ठरणारे भत्ते व तद्नुषंगीक लाभ देय राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२१०९१४१२५५०८९९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Ravindra V Gurav

Digitally signed by Ravindra V Gurav
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY, LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, pseudonym=B67CC3974B29D17A658E4CE714FCD068FD7E189B, serialNumber=9DFB7AEFBD9E82B129C324D567B46E1D853D93C38D6E222C868EAC72ECD12784, cn=Ravindra V Gurav
Date: 2021.09.16 11:14:36 +05'30'

**( रविंद्र गुरव )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:** १. व्यवस्थापकिय संचालक, महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ, नागपूर
२. निवडनस्ती, उद्योग-९.

नस्ती क्र.एमएसएमसी-०७१९/प्र.क्र.०९/उद्योग-९ चे विवरणपत्र

# विवरणपत्र

## महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ, नागपूर यांच्या आस्थापनेवरील सध्या कार्यरत अधिकारी / कर्मचा-यांची ०७ व्या वेतन आयोगानुसार ०१.०७.२०२१ रोजीची सुधारीत वेतनश्रेणी

| अ. क्र. | पदनाम/ संवर्ग | विद्यमान वेतनसंरचना | | ०७ व्या वेतन आयोगानूसार सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतन स्तर |
|---|---|---|---|---|
| | | वेतन बँड | ग्रेड वेतन | |
| १. | खाण व्यवस्थापक वर्ग - १ | १५६०० - ३९१०० | ६६०० | S - २३ : ६७७०० - २०८७०० |
| २. | खाण व्यवस्थापक वर्ग - २ | १५६०० - ३९१०० | ५४०० | S - २० : ५६१०० - १७७५०० |
| ३. | मुख्य लेखा व वित्त अधिकारी | १५६०० - ३९१०० | ५४०० | S - २० : ५६१०० - १७७५०० |
| ४. | सहाय्यक व्यवस्थापक | ९३०० - ३४८०० | ४४०० | S - १५ : ४१८०० - १३२३०० |
| ५. | खाण फोरमन | ९३०० - ३४८०० | ४४०० | S - १५ : ४१८०० - १३२३०० |
| ६. | वरिष्ठ लघुलेखक | ९३०० - ३४८०० | ४४०० | S - १५ : ४१८०० - १३२३०० |
| ७. | लेखापाल | ५२०० - २०२०० | २८०० | S - १० : २९२०० - ९२३०० |
| ८. | ऑपरेटर कम मेक्यानिक | ५२०० - २०२०० | २८०० | S - १० : २९२०० - ९२३०० |
| ९. | खाण मेट | ५२०० - २०२०० | २४०० | S - ८ : २५५०० - ८११०० |
| १०. | वरिष्ठ लिपीक | ५२०० - २०२०० | २४०० | S - ८ : २५५०० - ८११०० |
| ११. | लिपीक / टंकलेखक | ५२०० - २०२०० | १९०० | S - ६ : १९९०० - ६३२०० |
| १२. | ब्लास्टर | ५२०० - २०२०० | १९०० | S - ६ : १९९०० - ६३२०० |
| १३. | वाहन चालक | ५२०० - २०२०० | १९०० | S - ६ : १९९०० - ६३२०० |
| १४. | शिपाई | ४४४० - ७४४० | १६०० | S - ३ : १६६०० - ५२४०० |